**राज्यात आदर्श शाळा विकसित करणे या योजनेंतर्गत शाळांच्या दुरूस्ती/पुनर्बांधणीसाठी व नवीन बांधकामासाठी रू.४७९.४८ कोटी इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२१/प्र.क्र. ६५/एसडी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १३ डिसेंबर, २०२१.

**वाचा -**

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक - संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१४३/एसडी-६, दि. ०५ मार्च, २०२१.
२. महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे पत्र क्र. मप्राशिप/सशि/बांध-२०३१/२०२१-२२ /२५२१, दि.२५ ऑगस्ट, २०२१ व दि.९ नोव्हेंबर, २०२१.
३. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक - संकीर्ण-२४१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प, दि. २४ नोव्हेंबर, २०२१.

**प्रस्तावना -**

राज्यात आदर्श शाळा विकसित करणे या योजनेंतर्गत संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये प्रथम टप्प्यात ४८८ शाळा निवडण्यात आल्या आहेत. सदर शाळांमध्ये इमारतीची दुरुस्ती/पुनर्बांधणी व नवीन बांधकामाकरिता मा. मंत्रिमंडळाच्या दि.१ सप्टेंबर, २०२१ रोजी झालेल्या बैठकीत राज्यात आदर्श शाळा विकसित करण्याच्या अनुषंगाने सदर शाळांच्या पुनर्बांधणी व दुरूस्तीसाठी रू.४९४.०० कोटी इतका निधी उपलब्ध करून देण्यास तत्वतः मान्यता देण्यात आली आहे. त्यापैकी रू.१००.०० कोटी इतका निधी या विभागाच्या इ-गव्हर्नंस या लेखाशिर्षाखाली राखून ठेवण्यात आलेला असल्याने तो पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदरहू निधी खर्च करण्याकरिता नवीन लेखाशिर्ष उघडण्यासदेखील मान्यता दिली आहे. महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेने संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये सदर शाळांची दुरुस्ती/पुनर्बांधणी व नवीन बांधकामासाठी रु.४७९.४८ कोटी इतक्या रक्कमेचे अंदाजपत्रक सादर केले आहे. त्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राज्यात आदर्श शाळा विकसित करणे या योजनेंतर्गत शाळांच्या दुरूस्ती/पुनर्बांधणी व नवीन बांधकामासाठी समग्र शिक्षा कार्यालयाकडून प्राप्त झालेले रू.४७९,४८,६०,०९५/- (रुपये चारशे एकोणऐंशी कोटी अठ्ठेचाळीस लक्ष साठ हजार पंचान्नव रुपये मात्र) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेवरील खर्च खालील लेखाशिर्षाखाली उपलब्ध तरतूदीमधून भागवावा :-

| अ.क्र. | लेखाशिर्ष |
|---|---|
| १ | **मागणी** क्र. ई-२<br>२२०२, सर्वसाधारण शिक्षण<br>०१, प्राथमिक शिक्षण<br>१०१, शासकीय प्राथमिक शाळा<br>(००)(०१) राज्यात आदर्श शाळा विकसित करणे<br>२७ लहान बांधकामे (२२०२ J ०७२) (कार्यक्रम) |
| २ | **मागणी** क्र. ई-२<br>२२०२, सर्वसाधारण शिक्षण<br>०२-माध्यमिक शिक्षण<br>१०९-शासकीय माध्यमिक शाळा<br>(००)(०४) राज्यात आदर्श शाळा विकसित करणे<br>२७ लहान बांधकामे (२२०२ J ०८१) (कार्यक्रम) |
| ३ | **मागणी** क्र. ई-४<br>४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च<br>०१ - सर्वसाधारण शिक्षण<br>२०१ - प्राथमिक शिक्षण<br>(००) (०३) राज्यात आदर्श शाळा विकसित करणे<br>५३ मोठी बांधकामे (४२०२६४९८) (कार्यक्रम) |
| ४ | मागणी क्र. ई-४<br>४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च<br>०१ - सर्वसाधारण शिक्षण<br>२०२ - माध्यमिक शिक्षण<br>(००) (०९) राज्यात आदर्श शाळा विकसित करणे<br>५३ मोठी बांधकामे (४२०२६५०४) (कार्यक्रम) |

३. उपरोक्त लेखा शिर्षाखाली तरतूद वेगळ्याने टप्प्या-टप्याने जिल्ह्याना उपलब्ध करून देण्यात येईल या तरतूदीमधून सोबतच्या परिशिष्ट-अ मधील सुविधासाठी खर्च अनुज्ञेय राहील. सदर खर्च करताना प्रचलीत नियम व शासनाने वेळोवेळी दिलेल्या निर्देशांचे पालन करण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.३५७/१४७१, दि.२६.११.२०२१ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.११०५/२०२१व्यय-५,दि.०३.१२.२०२१अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. निधी वितरणाचे आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२१३१६५८००३८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, serialNumber=01d5ac9d227fcf738d4d5a366976c83175db4f058411807fb1031c17dd155677, cn=RAJENDRA SHANKARRAO PAWAR
Date: 2021.12.13 17:01:08 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य.
२) मा.मुख्यमंत्री/मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री/मा.राज्यमंत्री, शालेय शिक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४) मा.विरोधी पक्षनेता (विधानपरिषद/विधानसभा) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
५) मा. विधानपरिषद/विधानसभा, सदस्य (सर्व)
६) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
११) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१२) महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१४) सर्व जिल्हा शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक व उच्च माध्यमिक)
१५) वरिष्ठ कोषागार अधिकारी (सर्व)
१६) शिक्षण संचालक (प्राथमिक/माध्यमिक व उच्च माध्यमिक)
१७) विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व)
१८) वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१९) अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०) निवड नस्ती (एसडी-६)

**परिशिष्ट -अ**

| अ.क्र | अनुज्ञेय सुविधा |
|---|---|
| १. | विद्यार्थी संख्येनुसार वर्ग खोल्या . |
| २. | मुलां-मुलींकरीता व CWSN साठी स्वतंत्र व पुरेशी स्वच्छता गृहे. |
| ३. | पेयजल सुविधा व हँड वॉश स्टेशन. |
| ४. | ग्रंथालय / वाचनालय. |
| ५. | संगणक कक्ष. |
| ६. | Virtual class room ची सुविधा. |
| ७. | शाळेला संरक्षक भिंत. |